वन विभागातील अधिकारी / कर्मचारी यांना सुधारीत दराने गणवेश भत्ता मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांक: एफएसटी-०९/१६/ प्र.क्र.४१५/फ-४

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ:** १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन, दुय्यम संवर्ग), म.रा. नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१० (२)/आस्था/एक/प्र.क्र./(१५-१६)/१६९/१६-१७ दि. २९/७/२०१६ व दि.१७/९/२०१६.
२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक एस-१४/२००८/प्र.क्र.२९/फ-५ दिनांक २४/११/२०११.

**प्रस्तावना :**

मुंबई वन संहिता खंड एक परिच्छेद १३२ मधील तरतूदी व अस्तित्वात असलेल्या शासन आदेशानुसार वन विभागातील क्षेत्रीय अधिकारी व कर्मचारी यांना शासन खर्चाने गणवेश पुरविला जातो. सद्य:स्थितीत महसूल व वन विभागाचा शासन निर्णय दिनांक ०१/०२/१९९५, दि.१९/०३/१९९५ व शासन परिपत्रक दिनांक २४/११/२०११ मध्ये ठरवून दिलेल्या उद्दिष्टानुसार गणवेश व त्यासंबधी इतर २१ बाबींचा पुरवठा करण्यात येत आहे.

वन विभागातील कर्मचारी व अधिकाऱ्यांचा उत्तम गणवेश हा त्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या कार्यक्षमतेने आणि परिणामकारकरीत्या पार पाडण्यास बळ देणारा आहे. वन, वन्यजीव, जैवविविधता, पर्यावरण, निसर्ग यांचे संरक्षण आणि संवर्धन विषयक कामे प्रभावीपणे पार पाडताना अधिकारी/कर्मचाऱ्यांचा उत्कृष्ट गणवेश समाजामध्ये मानाचे आणि आदराचे स्थान निर्माण करण्यास उपयुक्त ठरतो.

वन विभागांतर्गत कर्मचारी/अधिकारी यांना पुरविण्यात येणाऱ्या गणवेशाच्या किमंतीमध्ये व त्यासोबत पुरविण्यात येत असलेल्या बाबींच्या संख्येत वाढ झाली आहे. वन विभागातील क्षेत्रीय अधिकारी/ कर्मचारी यांना बदलत्या काळानुसार वापराकरिता सोयीस्कर, निसर्गाशी व समारंभाशी समरुप राहणारा विशिष्ट रंगाचा गणवेश व त्यासोबत पुरविण्यात येणाऱ्या बाबींसाठी सुधारीत दराने गणवेश भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यास अनुसरुन शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वन विभागातील वनक्षेत्रपाल, वनपाल, वनरक्षक, वनक्षेत्र सर्व्हेक्षक आणि सर्व्हेक्षक या संवर्गातील अधिकारी /कर्मचारी यांना गणवेश व त्यासोबतच्या २५ बाबींसाठी वार्षिक रुपये ५१६७/- (रुपये पाच हजार एकशे सदुसष्ठ फक्त) दराने सुधारीत भत्ता मंजूर करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

ज्या २५ बाबींचा गणवेश भत्यामध्ये समावेश राहील त्या बाबी खालीलप्रमाणे राहतील.

| अ.क्र. | गणवेश साहित्याचे नाव | कालावधी व प्रमाण |
|---|---|---|
| १ | खाकी पॅन्ट | १ वर्षाकरिता २ संच |
| २ | खाकी शर्ट | १ वर्षाकरिता २ संच |
| ३ | खाकी साडी | १ वर्षाकरिता २ संच |
| ४ | खाकी ब्लॉऊज | १ वर्षाकरिता २ संच |
| ५ | खाकी पेटीकोट | १ वर्षाकरिता २ संच |
| ६ | खाकी वुलन जर्सी | २ वर्षाकरिता १ नग |
| ७ | बॅरेट कॅप | १ वर्षाकरिता २ जोडी |
| ८ | लेदर अँकल शुज | १ वर्षाकरिता १ जोडी |
| ९ | शुज लाल | १ वर्षाकरिता १ जोडी |
| १० | खाकी सॉक्स | १ वर्षाकरिता ३ जोडी |
| ११ | वुलन सॉक्स | १ वर्षाकरिता २ जोडी |
| १२ | व्हिसल कॉर्ड | २ वर्षाकरिता २ नग |
| १३ | व्हिसल | १ वर्षाकरिता १ नग |
| १४ | नेम प्लेट | २ वर्षाकरिता २ नग |
| १५ | रेनकोट (शर्ट व पॅन्ट) | २ वर्षाकरिता १ नग |
| १६ | बक्कल प्लेट बेल्ट | २ वर्षाकरिता १ नग |
| १७ | शोल्डर बॅज | २ वर्षाकरिता २ नग |
| १८ | ऑर्म बॅज | १ वर्षाकरिता २ नग |
| १९ | लाठी | २ वर्षाकरिता १ नग |
| २० | हॅवर सॅक | २ वर्षाकरिता १ नग |
| २१ | वॉटर बॉटल | २ वर्षाकरिता १ नग |
| २२ | सिंगनेट बनियन | १ वर्षाकरिता २ नग |
| २३ | खाकी शॉर्टस् | १ वर्षाकरिता १ संच |
| २४ | खाकी वुलन जॅकेट | २ वर्षाकरिता १ नग |
| २५ | कॅप बटन | १ वर्षाकरिता २ जोडी |

प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च महसूल वन वन विभाग मागणी क्रमांक-सी-१० ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च (योजनेत्तर) १०२, सामाजिक व क्षेत्र वनीकरण (०८) (०१) वनविकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमातून वित्त व्यवस्था केलेल्या योजना (४४०६ ०१७१) योजनेत्तर १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षा खाली मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६०/२०१६/व्यय-१० दिनांक २३/०९/२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१६११०४१२३६४२८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2016.11.04 12:42:25 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, १२, रॉवेल प्लाझा, कडबी चौक, कामठी रोड, नागपूर
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
८) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्य जीव) (सर्व),
९) वनसंरक्षक (सर्व)
१०) उप वनसंरक्षक (सर्व)
११) विभागीय वन अधिकारी (सर्व)
१२) उपविभागीय वन अधिकारी (सर्व)
१३) महालेखापाल-१ ( लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई
१४) महालेखापाल-२ ( लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५) महालेखापाल-१ ( लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६) महालेखापाल-२ (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर
१७) मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१८) वन विभागाचे सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१९) निवड नस्ती फ-४ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२